घरबांधणी अग्रिम मंजूर करताना
घराच्या किंमतीवरील कमाल
मर्यादा सुधारणेबाबत.

महाराष्ट्र शासन,
वित्त विभाग,
शासन निर्णय-क्रमांक:घबांअ-1092/प्र.क्र.76/92/विनियम,
मंत्रालय, मुंबई 400 032. दिनांक 3 ऑक्टोबर 1992.

पहावे:- शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक-घबांअ-1090/(18)/विनियम, दिनांक 11 जुलै 1990.

निर्णय

राज्य शासकीय कर्मचा-यांना घरबांधणी अग्रिम मंजूर करताना घराच्या कमाल किंमतीबाबतच्या मर्यादा उपरोक्त दिनांक 11 जुलै 1990 च्या शासन निर्णयानुसार विहित केलेल्या आहेत. उक्त शासन निर्णयातील घराच्या किंमतीबाबतच्या कमाल मर्यादा सुधारणाबाबतचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. या संदर्भात शासनाने घराच्या किंमतीबाबतच्या कमाल मर्यादा खाली नमूद केल्याप्रमाणे सुधारण्याचा निर्णय घेतला आहे.

2. नवीन बांधावयाच्या किंवा विकत घ्यावयाच्या तयार घराची किंमत (जमिनीची किंमत वगळून) शासकीय कर्मचा-याच्या मूळ मासिक वेतनाच्या 150 पट परंतु किमान रुपये 2.50 लाख आणि कमाल रुपये 6.00 लाख या विहित मर्यादेत असावी.

3. हे आदेश निर्गमित होण्यापूर्वी ज्या प्रकरणी केवळ घराच्या किंमतीच्या कमाल मर्यादेबाबतच्या विहित अटींचे पालन होत नाही म्हणून घरबांधणी अग्रिम नामंजूर करण्यात आलेला आहे अशी, दिनांक 1 नोव्हेंबर 1991 नंतर वित्त विभागाच्या मान्यतेसाठी सादर केलेली व वित्त विभागाने नामंजूर केलेली, आणि वरील परिच्छेद-2 मध्ये नमूद केलेल्या विहित किंमत मर्यादेनुसार अग्रिम अनुज्ञेय होत असेल आणि मुंबई वित्तीय नियम, 1959 च्या परिशिष्ट 26 मधील इतर सर्व संबंधीत नियम व तद् अनुषंगिक कार्यकारी आदेशांतील तरतुदींची पूर्तता होत असेल, तर अशा सर्व प्रकरणी फेरविचार करुन घरबांधणी अग्रिम मंजूर करण्यात यावा.

4. मुंबई वित्तीय नियम, 1959 च्या परिशिष्ट 26 मधील घरबांधणी अग्रिमविषयक संबंधित नियमांमध्ये औपचारिक सुधारणा यथावकाश करण्यांत येईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

पु. ल. सवाई,
अवर सचिव, वित्त विभाग.

प्रत:-

राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,

(कृ.मा.प.)

शामपु-रोटा-विवि-एच-546(13,000+10-11-92)

सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
मंत्रालयातील सर्व प्रशासकीय विभागांचे सचिव,
उप सचिव, सहकार व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय,
सर्व विभागीय आयुक्त/सर्व जिल्हाधिकारी/सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी/सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
सर्व उप कोषागार अधिकारी,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-1, महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-2, महाराष्ट्र, नागपूर,
महालेखापाल (लेखा परीक्षा)-1, महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल (लेखा परीक्षा)-2, महाराष्ट्र, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
मंत्रालयाच्या विविध प्रशासकीय विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
विशेष आयुक्त, महाराष्ट्र शासन, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली 110 001,
वित्त विभागातील सर्व अधिकारी,
वित्त विभागातील सर्व कार्यासने,
सर्व जिल्हा परिषदांच्या अर्थ विभागातील मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
निवड नस्ती, विनियम.

---

एच-646(13,000+10-11-92)-अ